**श्री एस.एस.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त) यांची भा.व.से. (वेतन) नियम दुसरी सुधारणा-२००८ च्या नियम ३ खालील टिप ३ मधिल तरतूदीनुसार अकार्यकारी आधारावर ( on non-functional basis ) वेतन निश्चिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एएफओ-१०१७ / प्र.क्र. ८० / फ-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २ मे, २०१७

<u>वाचा</u> : १) शासन आदेश क्रमांक आयएफएस/१३९४/सीआर ३७१(भाग २)/फ-७, दि. ३.४.२०१२
२) शासन आदेश क्रमाक वेतन १०-२००९/वै.न.क्र. १२९/भावसे(ले) दि. १२ मे,२००९

**शासन आदेश :-**

भारतीय वन सेवा (वेतन) नियम, दुसरी सुधारणा २००८, अधिसूचना दि.२७.९.२००८ मधील नियम क्र. ३ खालील टिप ३ नुसार जेव्हा राज्य किंवा संयुक्त संवर्गातील भाप्रसे अधिकारी केंद्र शासनाच्या सेवेत पे बॅन्ड ३ किंवा ४ च्या विशिष्ठ ग्रेड पे मधील ग्रेड मध्ये नियुक्त केला जातो तेव्हा जो भावसे संवर्गातील सदस्य अशा भाप्रसे अधिकाऱ्यांपेक्षा २ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त सेवाज्येष्ठ असेल परंतू त्याची त्या विशिष्ठ ग्रेड मध्ये पदोन्नती झाली नसेल तर सदर विशिष्ठ ग्रेड मध्ये भाप्रसे अधिकाऱ्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून वनसेवा संवर्गातील २ वर्षे सेवाज्येष्ठ असलेल्या अधिकाऱ्यांची त्याच विशिष्ठ ग्रेड मध्ये अकार्यकारी आधारावर नियुक्ती करण्याबाबत तरतुद करण्यात आली आहे. केंद्र शासनाच्या दि. ३.३.२०१० च्या अधिसूचनेन्वये ही तरतुद H.A.G. स्केल मधील अधिकाऱ्यांना देखील लागू करण्यात आली आहे. सदर लाभ दि. १.१.२००६ पासून अनुज्ञेय करण्यात आली आहे.

२. वर नमूद केलेल्या नियमातील तरतुदी व केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या सूचनांच्या अनुषंगाने श्री एस.एस.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त) यांचे भारतीय वन सेवेमध्ये नियुक्त केल्याचे वर्ष १९८३ आहे. श्री मिश्रा हे केंद्र शासनाकडील भारतीय प्रशासन सेवेतील श्री सरस्वती प्रसाद (भा.प्र.से. भरती वर्ष एएम १९८५ ) सिव्हिओ, अवजड उद्योग व सा.यु.,भारत सरकार यांच्यापेक्षा २ वर्षे वा जास्त सेवाज्येष्ठ आहेत.

३. श्री मिश्रा, भावसे (सेवानिवृत्त) यांना निकटचे कनिष्ठ असलेले अधिकारी श्री बी.एस.के.रेड्डी, भावसे यांना दि. १.१.२००६ पासून अकार्यकारी आधारावर मुख्य वनसंरक्षक पदाची वेतनश्रेणी ३७४००-६७००० + श्रेणी वेतन रु. १०,०००/- शासन ज्ञापन दि. १२ मे,२००९ अन्वये उपरोक्त केंद्र शासनाच्या तरतुदीनुसार मंजूर करण्यात आली आहे.

४.    श्री मिश्रा हे राज्य शासनाच्या सेवेत कार्यरत असताना त्यांच्या विरुध्द सुरु असलेल्या शिस्तभंग विषयक कारवाई च्या अनुषंगाने  तसेच फौजदारी प्रकरणाच्या अनुषंगाने त्यांच्या पुढील पदांवरील पदोन्नतीचा निर्णय जाणीवपूर्वक राखून ठेवण्यात आला होता.  संदर्भ क्र. १ येथील दि. ३.४.२०१२ च्या शासन आदेशान्वये श्री.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त) यांच्या विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई तसेच फौजदारी प्रकरण निकाली निघाले असून श्री मिश्रा यांची निर्दोष मुक्तता करण्यात आली आहे.

५.    उपरोक्त बाबी पहाता, श्री एस.एस.मिश्रा, भावसे यांना त्यांचे निकटचे कनिष्ठ अधिकारी श्री बी.एस.के.रेड्डी, भावसे यांना मुख्य वनसंरक्षक पदावरील अकार्यकारी वेतनश्रेणी मंजूर केल्याच्या दिनांक १.१.२००६ पासून अकार्यकारी आधारावर रु. ३७४०० -६७००० + श्रेणी वेतन रु. १०,०००/- ही वेतनश्रेणी खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे -

अ) अकार्यकारी ( non-functional )आधारावर श्री एस.एस.मिश्रा यांना मंजूर केलेल्या वेतनश्रेणीमध्ये, कार्यकारी (functional) आधारावर त्यांची नियुक्ती झाल्यानंतर त्यांची पुन्हा वेतननिश्चिती केली जाणार नाही.

ब) अकार्यकारी पदाची वेतननिश्चिती अनुज्ञेय झाल्यानंतर त्याच दिनांकापासून यापूर्वी आहरण केलेले वेतन समायोजित करण्यात यावे.

क) सदर वेतननिश्चीती वेतन पडताळणी पथकाच्या तपासणी व लेखा परीक्षणाच्या अधीन राहील. अशा तपासणीनुसार वेतननिश्चितीमध्ये जादा रक्कम प्रदान झाली असल्यास, जादा प्रदान केलेले वेतन व भत्ते वसूलपात्र राहील.

ड) सदर वेतननिश्चितीमुळे देय ठरणारी थकबाकीपोटीची रक्कम सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र. साप्रवि/भाप्रसे-११०८/प्र.क्र.२४६/नऊ-अ, दि. ६.१०.२००८ च्या परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे देय राहील.

६.    सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०३१११७४६२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.05.03 11:18:50 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति :**

श्री एस. एस.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त),
(प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या मार्फत)

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक),नागपूर
८. महालेखापाल , १ / २- (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
९. सहायक संचालक, भावसे लेखा विभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती/ वैयक्तिक नस्ती